**खरीप हंगाम २०१० मध्ये डिएपी/ एमएपी , संयुक्त खते व एमओपी खताचा संरक्षीत साठा करण्यासाठी लागणाऱ्या खर्चापोटी अग्रीम रक्कम उपलब्ध करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक राखते ३७०९/ प्रक्र १९५ /१७-अे,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०००३२
दिनांकः- १५ मार्च,२०१०.

**वाचा** :१) महाव्यवस्थापक (वि.व.ले), महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, यांचे पत्र क्र. खते/२०१०/८५८१, दि. २१.०१.२०१०

**प्रस्तावनाः-**

खरीप हंगाम २०१० मध्ये राज्यातील शेतक-यांना डिएपी/ एमएपी,संयुक्त व एमओपी रासायनिक खताचा पुरवठा करण्याकरिता ६.०० लाख मेट्रीक टन खताचा संरक्षित साठा करण्याचा निर्णय दि. १२.०१.२०१० रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आला आहे. याकरिता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ व महाराष्ट्र स्टेट कोऑपरेटीव्ह मार्केटींग फेडरेशन या दोन्ही संस्थांना नोडल एजन्सी म्हणून शासनाने नेमले आहे.यापैकी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ ३.५० लाख मे. टन डिएपी/ एमएपी, संयुक्त व एमओपी रासायनिक खताचा संरक्षित साठा करणार असून, याकरीता महामंडळ घेत असलेल्या कर्जावरील व्याज, शासन हमी शुल्क, गोदाम भाडे, वाहतुक व हमालीकरिता होणा-या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळास अग्रीम रक्कम देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

खरीप हंगाम २०१० मध्ये डिएपी/ एमएपी,संयुक्त व एमओपी रासायनिक खताचा संरक्षित साठा करण्याकरिता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ घेत असलेल्या कर्जावरील व्याज, शासन हमी शुल्क, गोदाम भाडे, वाहतुक व हमालीकरिता होणा-या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळास सन २००९-२०१० मध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु.१०.०० कोटी (अक्षरी रु.दहा कोटी फक्त) वितरित करण्यास या आदेशान्वये मान्यता देत आहे.

२. यासाठी होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली सन २००९-१० मध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष:** २४०१, पिक संवर्धन
**(००)(१०५)** खते व रासायनिक खते
**(००)(३१)** डीएपी आणि मिश्र रासायनिक खतांचा पुरवठा करण्यासाठी येणारा खर्च भागविण्याकरीता अर्थसहाय्य (२४०१८२०८)
३३ अर्थसहाय्य

३. वरील निधीबाबत संचालक (नि. व गु.नि.) कृषि आयुक्तालय,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर निधी वितरित करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. संचालक (नि.व गु.नि.) यांनी ही रक्कम कोषागारातून काढून महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाकडे खत वाहतुकीच्या अनुदानाकरिता वितरित करावी. त्याबाबतचा खर्चाचा तपशिल त्यांचेकडून घेऊन शासनास सादर करावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६४/१०/व्यय १, दि.८/३/२०१० अन्वये प्राप्त सहमतीनूसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३१७१३३१०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वा. म. तुरूकमाने)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रतिः

आयुक्त (कृषि),महाराष्ट्र राज्य,पुणे.
संचालक (नि. व गु.नि.)कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
व्यवस्थापकिय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ,मुंबई.
महालेखपाल महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र १/२(लेखा परिक्षा)मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
जिल्हा कोषगार अधिकारी,पुणे
अर्थसंकल्प शाखा (२-अे) कृषि व पदुम विभाग.मंत्रालय,मुंबई-३२.
वित्त विभाग/व्यय-१, कार्यासन अर्थसंकल्प १३ ,मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती.